**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(५१)/का-१४११,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. १३ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२.
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी "महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" व "नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुनःस्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (महानगरपालिका)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार भिंगार छावणी परिषद (अहमदनगर महानगरपालिका) अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. ९.१५ कोटी एवढ्या किमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर हे राहतील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC कोड व खाते क्रमांक) नियोजन

विभागास सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, अहमदनगर / कार्यान्वयीन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तीचे पालन करणे बंधकारक राहील.

५. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन, (०१)(०१), नागरी स्थानिक संस्थांना (महानगरपालिका) सहायक अनुदान (३६०४ १००९) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातुन भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३२०१०२७१८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc8077686 47a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF 60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.13 20:19:36 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग.
२. जिल्हाधिकारी, अहमदनगर
३. आयुक्त, अहमदनगर महानगरपालिका, अहमदनगर.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, भिंगार छावणी परिषद, अहमदनगर.
५. जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर.
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर.
७. मा. उप मुख्यमंत्री(वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
१०. जिल्हा कोषागारे अधिकारी, अहमदनगर.
११. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(५१)/का-१४११, दि.१३ मार्च, २०२४ सोबतचे परिशिष्ट, भिंगार छावणी परिषद (अहमदनगर महानगरपालिका) रु.९.१५ कोटी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **अंदाजित रक्कम (रु.लाख)** |
| १ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ६ व ७ मधील पंचशील वेस ते साईबाबा मंदिरापर्यंत रस्ता काँक्रिटीकरण व साईड गटार व फुटपाथ रस्ता करणे. | ३०० |
| २ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ६ मधील अमोल वाघस्कर घर ते शंभु उपरे घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| ३ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ६ मधील फुलारी मेंबर घर ते पुलापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| ४ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ६ मधील शिंदे सर घर ते साळुंके घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| ५ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ४ मधील वाघस्कर गल्ली अंतर्गत मोहिते घर ते दाणेगल्ली चौकापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| ६ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ५ मधील लोहार गल्ली ते ब्युटी सेंटर पर्यंत विकसित करणे. | १८ |
| ७ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ७ मधील पंचशीलनगर अंतर्गत रस्ते विकसित करणे. | १८ |
| ८ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ५ मधील नेहरू चौक ते सरपण गल्ली (बेद्रे घर) पर्यंत रस्ता विकसित करणे. | ३० |
| ९ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ५ मधील अक्षय भांड घर ते भिंगार वेस पर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| १० | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ३ मधील सदर बाजार परिसर येथील रस्ता विकसित करणे. | १८ |
| ११ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक २ मधील गवळीवाडा अंतर्गत रस्ते विकसित करणे. | १८ |
| १२ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०४ मधील कॅन्टोमेंन्ट शाळेजवळील ग्राऊंडमध्ये सभा मंडप बांधणे. (हॉटेल समाधान समोर) | २५ |
| १३ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०४ मधील वाघस्कर गल्ली दत्त मंदिर चौक ते मुंजोबा मंदिर चौक पर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| १४ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०४ मधील मोमीन गल्ली येथील बाणेश्वर मंदिर ते हातरुणकर घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| १५ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०४ मधील शेखर वराडे घर ते राम मंदिर चौकापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| १७ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०४ मधील अत्तार घर ते मोमीनपुरा मस्जिद घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| १८ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०६ मधील नायाडु घर ते शेखर वराडे घर पर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| १९ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०५ मधील खळेवाडी येथील अस्ताना घर ते | १८ |

| | | |
|---|---|---|
| | फुलारी घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | |
| २० | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील जुना पॉवर हाऊस सदर बाजार मागील रस्ता व अंतर्गत रस्ता विकसित करणे. | १८ |
| २१ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील पिल्ले घर ते जग्गी घरापर्यंत विकसित करणे. | १८ |
| २२ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०६ मधील शुक्लेश्वर कॉलनी अंतर्गत ड्रेनेज लाईन व रस्ते विकसित करणे. | १८ |
| २३ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील विष्णु दुकान ते देशेट्टी घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| २४ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०६ मधील बदवार पोल्ट्री ते संदिप दळवी घरापर्यंत रस्ता विकसित करणे. | १८ |
| २५ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील शुक्लेश्वर कॉलनी परिसर येथे पीरबाबा परिसरात विकसित करणे. | १८ |
| २६ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील बुध्दविहार - १ येथे सदर बाजार परिसरात रस्ता विकसित करणे. | १८ |
| २७ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील जैन बेकरी परिसरात विकसित करणे. | १९ |
| २८ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील अमरधाम विकसित करणे. | १५ |
| २९ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०२ मधील सदर बाजार येथील भिंगार बँक मागे ते मटन मार्केट पर्यंत रस्ता विकसित करणे. | २० |
| ३० | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०५ मधील चौंडेश्वरी मंदिरासाठी बहुउद्देशीय सभागृह बांधणे. | ४० |
| ३१ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०७ मधील नेहरू कॉलनी येथे सभामंडप बांधणे. | ३० |
| ३२ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०३ मधील सदर बाजार बुध्द विहार - २ येथे पेव्हींग ब्लॉक बसविणे व समोरील रस्ता विकसित करणे. | २० |
| ३३ | भिंगार छावणी परिषद हद्दीतील प्रभाग क्रमांक ०४ मधील मारुती मंदिर ते हंपे पान दुकान पर्यंत विकसित करणे. | २० |
| | **एकूण** | **९१५** |

*********